स्मरणपत्र-२ महाराष्ट्र शासन

क्र.प्रतिनि-२०१६/प्र.क्र.४२/१६/का-१४
सामान्य प्रशासन विभाग
मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई-४०० ०३२.
दिनांक :-२६.०२.२०२०

**प्रति,**

सह /उप सचिव, (आस्थापना),
सर्व मंत्रालयीन विभाग
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

**विषय :-** महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालयातील सह सचिव हे पद प्रतिनियुक्तीने भरणेबाबत.

**मंत्रालयीन उप सचिव यांचेकडून इच्छुकता मागणी.**

**संदर्भ:-** १. शासन समक्रमांकीत दि.२८.०५.२०१९ चे पत्र.
२. शासन समक्रमांकीत दि.२४.०७.२०१९ चे पत्र.

महोदय/ महोदया,

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालयातील सह सचिव हे पद मंत्रालयातील उप सचिव संवर्गातून प्रतिनियुक्तीने भराण्याबाबत संदर्भ.क्र.१ येथील पत्रान्वये दि.७.६.२०१९ पर्यंत, तसेच संदर्भ क्र.२ येथील स्मरणपत्रान्वये दि.३१.७.२०१९ पर्यंत इच्छुकता मागविण्यात आल्या होत्या. मात्र सदर पदासाठी इच्छुकता प्राप्त झालेल्या नाहीत.

२. आता महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालयातील सह सचिव हे पद प्रतिनियुक्तीने भरण्याची अंतिम मुदत दि.१६.३.२०२० पर्यंत वाढविण्यात येत आहे. तरी या पदावर प्रतिनियुक्तीने जाण्यासाठी इच्छुक असलेल्या आपल्या विभागातील सह/उप सचिवांची नावे, त्यांचे मागील तीन वर्षाच्या गोपनीय अहवालांच्या प्रमाणित प्रतींसह, वैयक्तिक माहिती (Bio-data), संपूर्ण सेवा तपशील (कालावधी, विभाग, पद), ना-विभागीय चौकशीचे प्रमाणपत्र व विभागाचे ना-हरकत प्रमाणपत्र इ. माहिती संदर्भ क्र.१ येथील पत्रासोबत जोडलेल्या विहित नमुन्यात या विभागाकडे **दि.१६.०३.२०२० पर्यंत** निश्चितपणे प्राप्त होतील अशा रितीने पाठविण्यात यावी. तसेच कोणीही अधिकारी इच्छुक नसल्यास **निरंक** असेही या विभागास कळवावे, ही विनंती.

३. सदर पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक २०२००३०२१२०९५८१४०७ असा आहे. सदर पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

आपला विश्वासू,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2020.03.02 12:17:41 +05'30'

**(ग.भि.गुरव)**
**अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग**

**प्रत,**

१. महाराष्ट्र लोकसेवा आयोग ,५ ½,७ व ८ वा मजला,कुपरेज निगम इमारत ,महर्षी कर्वे मार्ग,कुपरेज,मुंबई-४०० ०२१
२. निवड नस्ती, कार्या.१४.